**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४ निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-१०१५/प्र.क्र.२०/१५/नवि-२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- ०४ मे, २०१७

वाचा:- १. मिरा-भाईंदर महानगरपालिका महासभा ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४.
२. आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/परिवहन/१३८/२०१४-१५, दि.२४/०२/२०१५.

प्रस्तावना:-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रम ठेकेदाराने लागू केलेली अन्यायकारक तिकिट दरवाढ रद्द करुन ती कमी करण्याबाबतचा ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४ मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने पारीत केला आहे. सदर ठराव मुंबई महानगर क्षेत्र प्रादेशिक परिवहन प्राधिकरणाच्या धोरणाशी विसंगत असल्याने, तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने उक्त ठराव आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी पुढील कारणास्तव विखंडीत करण्याची विनंती त्यांच्या वाचा क्र.२ येथील पत्रान्वये केली आहे:-

(अ) मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेच्या ठराव क्र.४, दि.१८/०६/२००९ नुसार परिवहन उपक्रमाच्या भाडे दरात सुसुत्रता आणण्याचे अधिकार महानगरपालिका आयुक्तांना देण्यात आले आहेत.

(ब) वरील अधिकारानुसार आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी बस तिकिट भाडे वाढीबाबत मुंबई महानगर क्षेत्र परिवहन प्राधिकरणास सादर केलेल्या प्रस्तावास प्राधिकरणाने सप्टेंबर, २०१२ व सप्टेंबर, २०१३ मध्ये मान्यता दिल्याने ही तिकिट दरवाढ लागू करणे आवश्यक होते.

(क) वरील (अ) व (ब) विचारात घेता, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने बस तिकिट भाडे वाढ त्वरीत रद्द करण्याबाबत पारित केलेला ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४ हा मुंबई महानगर क्षेत्र परिवहन प्राधिकरणाच्या निर्णयाशी विसंगत आहे. तसेच हा ठराव महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात आहे.

**३.** आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उक्त ठरावाच्या विखंडनाकरीता नमूद केलेली कारणमिमांसा विचारात घेता, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४ हा मुंबई महानगर क्षेत्र परिवहन प्राधिकरणाच्या निर्णयाशी विसंगत असल्याने, तसेच हा ठराव महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) अनुसार निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला ठराव क्र.४६, दि.२५/११/२०१४ हा या शासन निर्णयाच्या प्रस्तावनेत नमूद करण्यात आलेल्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) नुसार निलंबित करण्यात येत आहेत. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी ३० दिवसांत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५०४१६४१४५८८२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.04 16:43:27 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).